पाचगणी गिरिस्थान नगरपालिका (जि. सातारा)
**क्षेत्रास 'ब' वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक टिडीएस २०१९/९/प्र.क्र.५८८/ पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ९ ऑक्टोबर, २०२०.

संदर्भ :- १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१०/८/प्र.क्र.४६३/पर्यटन, दि.४/११/२०१०.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०११/१२/प्र.क्र.८५५/पर्यटन, दि.१६/१/२०१२.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१६/११/प्र.क्र.८६२/पर्यटन, दि.२५/४/२०१७.
४) जिल्हाधिकारी, सातारा यांचे पत्र क्र. नियोजन/ ब वर्ग /पर्यटन/का-६/३०३५, दि.३१/८/२०१९.

**प्रस्तावना :**

जिल्ह्यातील 'ब' वर्ग पर्यटनस्थळांची निवड करुन प्रस्ताव शासनाला सादर करण्याबाबतचे अधिकार संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये, संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयामधील जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीस प्रदान करण्यात आले आहेत. तसेच राज्यातील 'ब' वर्ग पर्यटनस्थळ घोषित करण्यासाठी निकष व कार्यपध्दती संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आली आहे.

२. पाचगणी गिरीस्थान शहर व परिसर महाराष्ट्रातील प्रसिध्द थंड हवेचे ठिकाण असून पर्यटनासाठी प्रसिध्द असे निसर्गरम्यस्थळ आहे. पाचगणी पर्यटनस्थळास विदेशी पर्यटकांसह देशभरातील पर्यटक वर्षभर भेट देत असतात. तसेच सदर पर्यटनस्थळ ब्रिटीश कालीन पर्यटनस्थळ म्हणून प्रसिध्द आहे. पाचगणी गिरिस्थान हे प्रसिध्द पर्यटनस्थळ समुद्र सपाटीपासून सुमारे ४३७८ फुट उंचावर आहे. या ठिकाणी आशिया खंडातील दुसरे महत्वाचे उंचावरचे अंदाजे १०० एकर मध्ये असलेले पठार असून त्यापैकी २० एकर क्षेत्रातील १.५ एकर क्षेत्रामध्ये तलाव आहे. याशिवाय सदर पठारावर कोरीव लेण्या आहेत. पाचगणी या पर्यटनस्थळाच्या परिसरामध्ये भौगोलिक दृष्ट्या उंचावरील कृष्णा, वेण्णा नदीचे खोरे, धरण परिसर आणि निसर्ग सौंदर्य दिसणारे पारशी पॉईंट, सिडने पॉईंट, स्वच्छ भारत पॉईंट, हॅरिसन फॉली इत्यादी ठिकाणे आहेत. याशिवाय या शहराचे तापमान प्रखर उन्हाळ्यामध्ये सुध्दा २५ ते ३० अंश सेल्सिअस पेक्षा जास्त नसते.

३. जिल्हाधिकारी, सातारा यांनी संदर्भ क्रमांक ४ येथील दि.३१/८/२०१९ च्या पत्रान्वये पाचगणी गिरिस्थान नगरपालिका क्षेत्रास 'ब' वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याची शिफारस केली आहे. त्यानुसार पाचगणी गिरिस्थान नगरपालिका क्षेत्रास 'ब'वर्ग पर्यटनस्थळाचा दर्जा देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

पाचगणी गिरिस्थान नगरपालिका क्षेत्रातील व परिसरातील पर्यटनस्थळांना दरवर्षी अंदाजे ६ ते ७ लक्ष पर्यटक भेट देतात. याशिवाय दरवर्षी अंदाजे ५ हजार इतके विदेशी पर्यटक भेट देतात. पाचगणी या पर्यटनस्थळाचे राज्यस्तरीय महत्व, मोठ्या प्रमाणात भेट देणाऱ्या पर्यटकांची संख्या, ऐतिहासिक व भौगोलिक महत्व इत्यादी बाबी विचारात घेता, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीएस २०१६/११/प्र.क्र.८६२/पर्यटन, दि.२५/४/२०१७ अन्वये राज्यातील 'ब' वर्ग पर्यटनस्थळे घोषित करण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या निकष व कार्यपध्दती नुसार सदर पर्यटनस्थळाची पर्यटन क्षमता (Tourism Potential) विचारात घेता "एक विशेष बाब " म्हणून पाचगणी गिरिस्थान नगरपालिका (जि. सातारा) क्षेत्रास 'ब'वर्ग पर्यटनस्थळ म्हणून घोषित करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००८११४३४१५१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: CN = Ramesh Jayaram Kadam, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT
Date: 2020.10.13 15:00:48 +05'30'

**( र. ज. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

| | |
|---|---|
| १) मा. राज्यपाल यांचे सचिव<br>२) मा. मुख्यमंत्राचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई<br>३) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.<br>४) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई<br>५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद<br>६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा<br>७) सर्व मा. विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद<br>८) सर्व मा. विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा<br>९) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव<br>१०) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>११) प्रधान सचिव (पर्यटन) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई. | १२) विभागीय आयुक्त, पुणे.<br>१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.<br>१४) संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.<br>१५) जिल्हाधिकारी, सातारा.<br>१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा<br>१७) अतिरिक्त जिल्हाधिकारी तथा जिल्हा पर्यटन समन्वय अधिकारी, सातारा<br>१८) नियोजन विभाग, मंत्रलाय, मुंबई.<br>१९) वित्त विभाग, मंत्रलाय, मुंबई.<br>२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)<br>२१) जिल्हा नियोजन अधिकारी, सातारा<br>२२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाची सर्व कार्यासने<br>२३) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई<br>२४) निवड नस्ती, पर्यटन |